**मुंबई येथे एशियन फिल्म फाऊंडेशनद्वारे आयोजित करण्यात येत असलेल्या आंतराष्ट्रीय चित्रपट महोत्सवास करमणूक शुल्कातून माफी देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## महसूल व वन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ईएनटी-२०१४/प्र.क्र.१९०/टी-१

३२वा मजला, सेंटर १ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कफ परेड, कुलाबा, मुंबई ४०० ००५
तारीख: १९ ऑगस्ट, २०१४

वाचा

शासन परिपत्रक क्र. ईएनटी१०८९/प्र.क्र.३२७९/टी-१ दि. ३० एप्रिल, १९९०
शासन निर्णय क्र. ईएनटी- १००७/ प्र.क्र.१५०/टी-१, दिनांक ६ नोव्हेंबर, २००८
शासन निर्णय क्र. ईएनटी- २०१२/ प्र.क्र.१२३/टी-१, दिनांक २३ जुलै, २०१४

प्रस्तावना

"एशियन फिल्म फाऊन्डेशन" या संस्थेद्वारे आयोजित करण्यात येत असलेल्या चित्रपट महोत्सवादरम्यान सदर चित्रपटाचे प्रदर्शन एकपडदा अथवा बहुविध चित्रपट गृहांमध्ये आयोजित केल्यास अनुज्ञेय होणाऱ्या करमणूक शुल्क आकारणीमध्ये माफी प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय

महाराष्ट्र करमणूक शुल्क अधिनियम १९२३ मधील कलम ६ (३) अन्वये प्राप्त अधिकारान्वये मुंबई येथे "एशियन फिल्म फाऊन्डेशन" द्वारे होणाऱ्या चित्रपट महोत्सवाकरिता शासनाच्या दि. ३० एप्रिल, १९९० रोजी निर्गमित परिपत्रकातील अट शिथिल करुन चित्रपट महोत्सवादरम्यान चित्रपटांचे खेळ नियमित चित्रपटगृहामध्ये आयोजित केल्यास या खेळांकरिता अनुज्ञेय करमणूक शुल्क माफी पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :**

- या चित्रपट महोत्सवाकरिता आयोजकांनी कॅटलॉग फी, नोंदणी शुल्क व इतर माध्यमाद्वारे शुल्क आकारणी ऐच्छिक ठेवावी. त्याप्रमाणे आयोजकांनी तसेच चित्रपटगृह चालकांनी चित्रपट महोत्सव आयोजित करण्यात येणाऱ्या चित्रपटगृहाच्या दर्शनी भागामध्ये प्रेक्षकांकरिता ठळक अक्षरात माहिती उपलब्ध करुन द्यावी.
- सदर करमणूक शुल्कातील सवलत वर्षातून एकदाच चित्रपट महोत्सवाच्या आयोजित दिनांकाकरिता (जास्तीत जास्त ७ दिवस) लागू राहील.
- उपरोक्त नमूद अटींची पूर्तता होते किंवा कसे याची जिल्हाधिकारी मुंबई यांनी दक्षता घ्यावी.
- **"एशियन फिल्म फाऊन्डेशन"** च्या वतीने आयोजित केला जाणाऱ्या आंतराष्ट्रीय चित्रपट महोत्सवाच्या खर्चाचे, प्राप्त होणाऱ्या प्रायोजकत्वाच्या रकमेचे, आकारण्यात येणाऱ्या ऐच्छिक नोंदणी शुल्क/कॅटलॉग फी याची संपूर्ण माहिती जिल्हाधिकारी कार्यालयास आयोजकांनी महोत्सव संपल्यानंतर ८ दिवसांमध्ये कळविणे बंधनकारक राहील.
- जिल्हाधिकारी कार्यालयाने या कार्यक्रमापोटी होणाऱ्या करमणूक शुल्क हानीची रक्कम परिगणित करुन त्याची माहिती विभागास द्यावी.
- करमणूक शुल्क माफी अनुज्ञेय असली तरीही जिल्हाधिकारी यांची कार्यक्रमाकरिता परवानगी घेणे तसेच आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करणे सदर संस्थेस बंधनकारक राहील.
- विनिर्दिष्टित केलेल्या कार्यक्रमाच्या आयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही करमणूकीच्या कार्यक्रमाबाबत या आदेशाचा वापर केला जाणार नाही. या आदेशात कोणत्याही प्रकारची दुरुस्ती फेरबदल करण्यात येणार नाही.
- संदर्भाधिन शासन निर्णयामध्ये नमूद उर्वरीत सर्व अटी व शर्ती तशाच्या तशा अस्तित्वात राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१९१६१११३१८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Vidya Ramppa Hampayya

Digitally signed by Vidya Ramppa Hampayya
DN: CN = Vidya Ramppa Hampayya, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.19 17:11:21 +05'30'

**(विद्या हम्पय्या)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत, तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) जिल्हाधिकारी मुंबई

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी**

१) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव,सांस्कृतिक कार्य विभाग
४) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १ मुंबई.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
६) श्री. किरण शांताराम, अध्यक्ष, एशियन फिल्म फाऊन्डेशन
७) निवड नस्ती